जिल्हा रुग्णालय नाशिक संलग्न परिचर्या प्रशिक्षण केंद्राचे बीएस्सी नर्सिंग महाविद्यालयात श्रेणीवर्धीन करण्यासाठी आवश्यक बांधकामाच्या अंदाजपत्र व बांधकाम आराखड्यास प्रशासकीय मान्यता देणेबाबत

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः** नर्सिंग-२०२२/प्र.क्र २१४/श्रेणीवर्धनप्रमा/सेवा-५
गोकुळदास तेजपाल रुग्णालय संकुल इमारत,
मंत्रालय, मुंबई ४०० ००१.
दिनांक : ०९ मार्च,२०२२

**वाचा :-**

१. उपसंचालक आरोग्य सेवा (शुश्रूषा), मुंबई यांचे पत्र क्र. संआसे/शुश्रूषा/कक्ष-९/टे-४/नाशिक बीएस्सी कॉलेज/प्र.मा./८९६/२२, दिनांक ०३.०३.२०२२.
२. केंद्र शासनाचे पत्र क्र. झेड २८०१५/२०/२०१९-एन, दिनांक १३.११.२०१९.

**प्रस्तावना:-**

केंद्र शासनाच्या स्वास्थ्य एवं परिवार कल्याण मंत्रालय, नवी दिल्ली यांचे दि. २७.०७.२०१७ च्या पत्रान्वये नॅशनल हेल्थ पॉलिसी २०१७ नुसार शुश्रुषा संवर्गासाठी रुग्णसेवा शुश्रुषा करणारी परिचारिका ही पदवीधर (बी.एस.सी. नर्सिंग) असावी असे निर्देशित केले आहे. यापूर्वीच्या मानकानुसार शुश्रूषा संवर्गाच्या सेवेत येणारी अधिपरिचारीकेची किमान शैक्षणिक अर्हता ही GNM (General Nursing Midwifery) ही पदविका होती. सन २०२२ नंतर सर्व GNM अभ्यासक्रम बंद करण्याबाबत केंद्र शासनाने इंडियन नर्सिंग काऊन्सिलना सूचना दिल्या होत्या. तथापि, कोविड महामारीमुळे GNM अभ्यासक्रमाचे बीएस्सी नर्सिंगचे श्रेणीवर्धन टप्याटप्याने करण्यास मुभा मिळालेली आहे. केंद्रशासनाने पहिल्या टप्प्यात सिंधूदुर्ग, नाशिक, सातारा जिल्ह्यातील परिचर्या प्रशिक्षण केंद्राचे श्रेणीवर्धन करण्यासाठी प्रत्येकी रुपये ६ कोटी इतका निधी मंजूर केलेला आहे व सदर निधींपैकी अस्तित्वात असलेल्या बांधकामामध्ये वाढ करणे किंवा आवश्यकतेनुरुप बदल करणे यासाठी रुपये ३,२०,५०,०००/- (अक्षरी तीन कोटी वीस लाख पन्नास हजार) प्रत्येक संस्थेच्या बँक खात्यात वर्ग केलेला आहे. त्यानुसार उपसंचालक आरोग्य सेवा (शुश्रूषा) मुंबई यांनी कार्यकारी अभियंता सार्वजनिक बांधकाम विभाग, नाशिक यांचेकडील तांत्रिक मान्यता असलेले बांधकाम आराखडे व अंदाजपत्रक वाचा क्र. ०१ मध्ये नमूद पत्रानुसार प्रस्ताव शासनास सादर केलेला आहे. त्यानुसार परिचर्या प्रशिक्षण केंद्र नाशिक यांच्या अस्तित्वतात असलेल्या इमारती मध्ये श्रेणीवर्धनासाठी आवश्यक असलेल्या बदलाच्या खर्चास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.त्यानुसार आता खालीलप्रमाणे शासन निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय:-**

जिल्हा रुग्णालय नाशिक संलग्न परिचर्या प्रशिक्षण केंद्राचे बीएस्सी नर्सिंग महाविद्यालयात श्रेणीवर्धन करण्यासाठी अस्तित्वात असलेल्या परिचर्या प्रशिक्षण केंद्राच्या इमारतीस आवश्यक असलेले बदल/बांधकाम व रुपांतरण करण्यास व यासाठी कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग यांनी प्रस्तावित

केलेल्या बांधकाम आराखडा व अंदाजपत्रकास प्रशासकीय खालील अटी व शर्तींच्या अधिन राहून मान्यता देण्यात येत आहे.

१. सदर प्रशासकीय मान्यता ही केंद्र शासनाकडून परिचर्या प्रशिक्षण केंद्र, नाशिक या इमारत व वसतीगृहाच्या अस्तित्वावत असलेल्या इमारतीत आवश्यक असलेले अतिरिक्त बांधकाम किंवा बांधकामातील बदल (विद्युतिकरणासह) यासाठी प्राप्त झलेल्या रुपये ३,२०,५०,०००/- (अक्षरी रुपये तीन कोटी वीस लाख पन्नास हजार फक्त) इतक्या मर्यादेत ग्राह्य राहील.

२. प्रस्तावित बदल व बांधकामासाठी व विद्युतिकरणासाठी विस्तृत अंदाजपत्रक तयार करुन त्यास संबंधित मुख्य अभियंता,विद्युत अभियंता यांचे साक्षांकन करुन घ्यावे. तसेच ढोबळस्वरुपात करण्यात आलेल्या तरतूदींबाबत काम करतेवेळी विस्तृत अंदाजपत्रके /दरपत्रके मंजूर करुनच हाती घ्यावी.

३. प्रत्येक कामाची स्वतंत्रपणे निविदा न काढता नमूद सर्व कामांसाठी एकत्र निविदा काढण्यात यावी.

४. प्रत्यक्ष बांधकाम करतेवेळी शासन निर्णय पर्यावरण विभाग, क्रमांक: ईएनवी-२०१३ /प्र.क्र. १७७ /तां.क.१, दिनांक १०.०१.२०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वांनुसार कार्यवाही करण्यात यावी.

उपरोक्त अटींची पूर्तता व नियमानुसार बांधकाम होत आहे हे सुनिश्चित करण्याची जबाबदारी ही जिल्हा शल्य चिकित्सक जिल्हा सामान्य रुग्णालय, नाशिक यांची राहील.

शासन निर्णय क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र ३०/१३ विनियम भाग-२, दि. २०.०९.२०१९ मधील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग-पहिला, उपविभाग-५, महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिका अंतर्गत परिच्छेदाखालील प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकारांच्या मर्यादेनुसार विभागाला प्राप्त असलेल्या अधिकारानुसार सदर शासन निर्णय निर्गमित करण्यात आला आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेतांक २०२२०३०९१२४४५२५६१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने.

ARCHANA VILAS WALZADE

Digitally signed by ARCHANA VILAS WALZADE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC HEALTH DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=b17094004b015083dae757656e5d24847898197ddd6b0366a9177f097ed0887a, pseudonym=EFE0AAA7FB78AD706283B7A34C5FC48C1920AEBD, serialNumber=B4E19876AB3EEC36E3A3B988441648AB87470CDFE66B14CFBE7AC9BD770485C1, cn=ARCHANA VILAS WALZADE
Date: 2022.03.09 15:00:56 +05'30'

(अर्चना वालझाडे)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१) आयुक्त तथा अभियान संचालक राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई

२) आयुक्त, वैद्यकीय शिक्षण व संशोधन संचालनालय,मुंबई.

३) सहसचिव, रुग्णालये (बांधकाम),सार्वजनिक आरोग्य विभाग,मुंबई.

४) महालेखापाल १ /२, महाराष्ट्र ( लेखा व लेखापरिक्षा ) / लेखा व अनुज्ञेयता, मुंबई/ नागपूर.

५) संचालक, आरोग्य सेवा आयुक्तलय, मुंबई/पुणे.

६) मुख्य अभियंता/कार्यकारी अभियंता/विद्युत अभियंता, नाशिक.

७) सहसंचालक, आरोग्य सेवा, रूग्णालये (राज्यस्तर), मुंबई.

८) सहाय्यक संचालक ( लेखा व लेखापरिक्षा ),आरोग्य सेवा, पुणे.

९) सहसंचालक, आरोग्य सेवा ( अर्थ व प्रशासन ), पुणे.

१०) उपसंचालक आरोग्य सेवा (शुश्रूषा), मुंबई.

११) उपसंचालक, आरोग्य सेवा, नाशिक मंडळ, नाशिक

१२) जिल्हा कोषागार अधिकारी, नाशिक

१३) जिल्हा शल्य चिकित्सक, जिल्हा रूग्णालय, नाशिक.

१४) निवडनस्ती( सेवा-५ )